**ऐतवडे खुर्द, ता.वाळवा, जि.सांगली येथील तलाव संवर्धनाचा प्रस्ताव रद्द करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रासयो-२०१०/प्र.क्र.६४/तां.क.३**
मंत्रालय, मुंबई- ४०००३२.
दिनांक: २७ ऑक्टोबर, २०१५

वाचा :

1) **या विभागाचा शासननिर्णय क्र. रासयो-२०१०/प्र.क्र.६४/तां.क.३, दि.२८ नोव्हेंबर,२०११ व दि. १३ डिसेंबर, २०११**
2) **दिनांक ५ फेब्रुवारी, २०१५ रोजीचे सुकाणू समितीच्या बैठकीचे इतिवृत्त**
3) **दिनांक २३ जुलै, २०१५ रोजीच्या आढावा बैठकीचे इतिवृत्त**

प्रस्तावना :

राज्यातील तलाव, सरोवरे व मोठे जलाशय यांचे पर्यावरणीयदृष्ट्या संवर्धन करण्यासाठी राज्य शासनाने राज्य सरोवर संवर्धन योजना सन २००६-०७ या वर्षापासून सुरू केली आहे. या योजनेंतर्गत ऐतवडे खुर्द, ता.वाळवा, जि.सांगली येथील तलाव संवर्धन प्रस्तावास सन २०११-१२ मध्ये एकूण रु. १,३९,२२,२५३/- (अक्षरी रु.एक कोटी एकोणचाळीस लक्ष बावीस हजार दोनशे त्रेपन्न फ़क्त) एवढ्या रकमेच्या खर्चास काही अटी व शर्तींच्या अधिन राहून मान्यता देण्यात आलेली होती. सदर योजना स्थानिक स्वराज्य संस्था सार्वजनिक बांधकाम विभागामार्फ़त राबवित होती. योजनेखाली शासन निर्णयातील अटी शर्तींचे अनुपालन होत नसल्याने याशिवाय विभागामार्फ़त वारंवार सूचना, पत्रव्यवहार करुनही संबंधित स्थानिक यंत्रणेमार्फ़त समाधानकारक प्रतिसाद प्राप्त होत नसल्याने व तद्नंतर संबंधित स्थानिक यंत्रणेच्या प्रतिनिधी यांनी दि. २३ जुलै, २०१५ रोजीच्या आढावा बैठकीत शासन निर्णयात नमूद स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा भरण्यास आणि प्रस्तावाची अमलबजावणी करण्यास असमर्थता दर्शविल्याने बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार सदर प्रस्ताव रद्द करुन मुक्त करण्यात आलेल्या निधी मधून अखर्चित निधी शासन जमा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

ऐतवडे खुर्द, ता.वाळवा, जि.सांगली येथील तलाव पर्यावरणीयदृष्ट्या संवर्धीत करण्यासाठी एकूण रु. १,३९,२२,२५३/- (अक्षरी रु.एक कोटी एकोणचाळीस लक्ष बावीस हजार दोनशे त्रेपन्न फ़क्त) एवढ्या खर्चाच्या प्रस्तावास विभागाने मान्यता दिलेली होती. सदर मंजुर एकूण रकमेपैकी ९०% म्हणजेच रु.१,२५,३०,०२७/- राज्य शासन हिस्सा व १०% म्हणून रु.१३,९२,२२६/- ग्रामपंचायत, ऐतवडे खुर्द यांचा हिस्सा समाविष्ट होता. मंजूर राज्यशासन हिस्स्यापैकी शासनाने जिल्हाधिकारी, सांगली यांना रु.६३,००,०००/- (अक्षरी रु. त्रेसष्ट लक्ष) संदर्भाधीन क्र.१ दि. १३ डिसेंबर, २०११ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आले होते. सदर योजना स्थानिक स्वराज्य संस्था सार्वजनिक बांधकाम विभागामार्फ़त राबवित होती.

२. प्रस्तावित योजनेनुसार ऐतवडे खुर्द, ता.वाळवा, जि.सांगली येथील तलाव पर्यावरणीयदृष्ट्या संवर्धीत करण्याबाबची कामे करावयाची होती. तसेच संदर्भ क्र.१ दि. २८ नोव्हेंबर, २०११ रोजीच्या शासननिर्णयात नमूद केल्यानुसार ग्रामपंचायत, ऐतवडे खुर्द यांचा हिस्सा अंतर्भूत करावयाचा होता. परंतु, दि. २३ जुलै, २०१५ रोजी अ.मु.स (पर्यावरण) यांच्या अध्यक्षतेखाली घेण्यात आलेल्या आढावा बैठकी दरम्यान संबंधित स्थानिक यंत्रणेच्या प्रतिनिधी यांनी योजनेंतर्गत मंजूर एकूण पाच कामांपैकी “Strengthening of Talava edges”या कामासाठी आतापर्यंत एकूण रु. ६०.५० लक्ष निधी खर्ची पडल्याचे नमूद करुन यापुढे मंजूर प्रस्तावातील उर्वरित उपक्रम राबविण्यासाठी तसेच स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा भरण्यास ग्रामपंचायत, ऐतवडे खुर्द आणि जिल्हा प्रशासन यांनी असमर्थता दर्शविलेली असल्याचे नमूद केले. सबब, सदर मंजूर केलेली प्रस्तावित योजना व निधी या शासन निर्णयाद्वारे रद्द करण्यात येत आहे.

३. या शासननिर्णयाद्वारे जिल्हाधिकारी, सांगली यांना वितरीत करण्यात आलेला एकूण निधी रू. ६३.०० लक्षपैकी खर्चित निधी वगळता शिल्लक राहिलेला निधी रु. २.५०/- लक्ष (अक्षरी रु. दोन लक्ष पन्नास हजार फ़क्त) व त्यावरील संपूर्ण व्याज असा एकत्रित निधी जिल्हाधिकारी, सांगली यांनी वित्त विभागामार्फ़त निर्गमित शासन परिपत्रक क्र.बीजीटी २०१५/प्र.क्र७१/अर्थसंकल्प-२ दि. ४ मार्च, २०१५ मधील परि.१ मधील(२)नुसार मागणी क्र. यू-४, मुख्यलेखाशिर्ष (३४३५ ०१८२) गौणशिर्ष ९१२- अखर्चित निधीची वजा वसूली असे नमूद करुन भरणा करण्यात यावा. उपरोक्त कार्यवाही ही वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. संकीर्ण-१०.१५/प्र.क्र.१८/अर्थोपाय दि. २५ ऑगस्ट, २०१५ तसेच दि. २३ जुलै, २०१५ रोजी आयोजित बैठकीच्या निर्णयान्वये होत असली तरी स्थानिक जलस्रोतांचे (तलावांचे) पर्यावरणीयदृष्ट्या संरक्षण करणे ही प्रामुख्याने स्थानिक यंत्रणेची जबाबदारी असते. सबब, उपरोक्त तलावातील पाणी कोणत्याही बाह्य स्रोतांमार्फ़त दूषित/प्रदूषित होणार नाही याची सर्वस्वी जबाबदारी स्थानिक यंत्रणेचे प्रमुख म्हणून सरपंच ग्रामपंचायत, ऐतवडे खुर्द तसेच जिल्हाधिकारी, सांगली यांची असेल.

४. सदर प्रस्तावासंबंधित आतापर्यंत झालेल्या एकूण खर्चाचे बाबनिहाय तपशिल, विहीत नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र, राबविलेल्या कामांचा गुणवत्ता अहवाल तसेच राबविलेल्या कामांत काही अनियमितता असल्याची शक्यता पडताळून आवश्यक ती चौकशी करुन कामे योग्य प्रकारे राबवली गेली नसल्यास संबंधित अधिकारी/कर्मचारी/संस्था/कंत्राटदार/ठेकेदार यांच्यावर शासन नियमांनुसार गुन्हा दाखल करुन केलेल्या कार्यवाहीचा अहवाल जिल्हाधिकारी, सांगली यांनी विभागास तातडीने सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०२७१५२०५७११०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Somnath Namdeo Bagul

Digitally signed by Somnath Namdeo Bagul
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b01714c1480a47cec5943a1c3c73ea95af0534418cf92d1ac844331c4116879d, cn=Somnath Namdeo Bagul
Date: 2015.11.04 16:54:16 +05'30'

**सो.ना.बागुल**
**उपसचिव, पर्यावरण विभाग**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन

२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा),महाराष्ट्र १/२,मंबई/ नागपूर.
४. जिल्हाधिकारी, जिल्हा कार्यालय, सांगली
५. सरपंच, ग्रामपंचायत, ऐतवडे खुर्द ता.वाळवा जि.सांगली
६. संचालक, नगरपालिका प्रशासन वरळी, मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, मंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. मा.मंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
१०. मा.राज्यमंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
११. अपर मुख्य सचिव, पर्यावरण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.
१२. प्रधान सचिव, नगरविकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.
१३. वित्त विभाग (कार्यासन क्रमांक व्यय-१६/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
१४. नियोजन विभाग, कार्यासन क्र.१४७२, मंत्रालय, मंबई.
१५. रोखशाखा, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवडनस्ती.